**जेएफपीआर प्रकल्पातील सन २०१६-१७ मधील अखर्चित रक्कम सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बासप्र- ०४१८ /प्र.क्र.८३ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०३ ऑगस्ट, २०१८

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.बासप्र-२००८/ प्र.क्र.४६/२१-स, दि.२९.१०.२०१०
२. शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.बासप्र-०७१६/ प्र.क्र.१०८/२१-स, दि.२२.०९.२०१६
३. प्रकल्प संचालक (JFPR),AIDIP प्रकल्प, पुणे यांचे पत्र क्र.जेएफपीआर/अखर्चित रक्कम १६-१७/ ५८२/२०१७, दि.२८.०४.२०१७
४. प्रकल्प संचालक (JFPR),AIDIP प्रकल्प, पुणे यांचे पत्र क्र.जेएफपीआर/अखर्चित रक्कम १६-१७/ ९४६/२०१८, दि.२४.०४.२०१८

प्रस्तावना :-

आशियाई विकास बँकेच्या अर्थसहाय्याने राज्यामध्ये कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक प्रकल्प (AIDIP) राबविला जात आहे. जेएफपीआर सहाय्यित महाराष्ट्रातील लहान शेतक-यांना बाजारपेठेशी जोडण्याचा प्रकल्प राबविण्यासाठी आशियाई विकास बँकेमार्फत १०० टक्के अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. जेएफपीआर प्रकल्पाच्या अंमलबजावणी करीता कृषि पणन मंडळांतर्गत निधी व्यवस्थापन कक्षाची (Grant Implementation Unit) निर्मिती करण्यात आलेली आहे. आशियाई विकास बँक सहाय्यित गरीबी निर्मूलनासाठी जपानचा निधी (जेएफपीआर) या प्रकल्पांतर्गत निधी प्राप्त होण्यासाठी आवश्यक ते करार करण्यास शासनाने दि.२९.१०.२०१० रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता दिलेली आहे. संदर्भ क्र. २ येथील दिनांक २२.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. २२०.०० लाख एवढी रक्कम प्रकल्पासाठी वितरीत करण्यात आली होती. त्यापैकी दि. ३१ मार्च, २०१७ अखेर रु. ३७.३९ लाख इतकी रक्कम खर्च झाली असून रु. १८२.६१ लाख एवढा निधी अखर्चित आहे. सदर अखर्चित रक्कम रु. १८२.६१ लाख सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आशियाई विकास बँक सहाय्यित लहान शेतकऱ्यांना बाजारपेठ उपलब्धता सुधारणा - जपान दारिद्रय निवारण निधी प्रकल्पास (JFPR) सन २०१६-१७ मध्ये वितरीत केलेल्या रकमेपैकी अखर्चित राहिलेली रु. १८२.६१ लाख एवढी रक्कम सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर रक्कम सन २०१६-१७ मध्ये प्रस्तावित केलेल्या बाबींवरच खर्च करण्यात यावी.
२) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक (JFPR) प्रकल्प, पुणे यांनी दक्षता घ्यावी आणि याबाबतचा अनुपालन अहवाल व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

२. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं-२९२/२०१८/व्यय २ दिनांक ०७.०७.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०३११३३२४०६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.08.03 11:35:29 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/(कृषि व पणन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
२. प्रकल्प संचालक, गरीबी निर्मूलनासाठी जपानचा निधी प्रकल्प(जेएफपीआर), मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे
३. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
४. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
५. सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, ५वा मजला, नवीन प्रशासन भवन,मंत्रालयासमोर,मुंबई ३२.
६. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. उप सचिव (पणन) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव (व्यय-२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.उप सचिव (का.१४३१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.अवर अधिकारी/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती (२१-स).